**सुरक्षा रक्षक मंडळात सुरक्षा रक्षकांची ऑनलाईन नोंदणी करण्यासाठी संगणक आज्ञावली विकसीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसजीए-२०१७/प्र.क्र.९९/कामगार-५,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
तारीख: १४ मार्च, २०१७

<u>वाचा :-</u>

१ मा मुंबई उच्च न्यायालयाचे रिट याचिका क्र.२९३९/२०१६ संदर्भातील दि. ८ फेब्रुवारी,२०१७ चे आदेश.

२ समक्रमांक शासन पत्र दिनांक २०/०२/२०१७

३. कामगार आयुक्त यांचे क्रमांक सुरक्षा/सर्व मंडळे/ऑन नोंदणी/२०१७/कार्या-२०१४, दिनांक ४ मार्च,२०१७ व दि. ८ मार्च, २०१७ चा प्रस्ताव.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम,१९८१ आणि त्या अंतर्गत योजना (सुधारणा) २०१२ मधील तरतूदीनुसार राज्यातील सुरक्षा रक्षकांच्या नोकरीचे नियमन व त्यांच्या कल्याणासाठी सदर कायद्याची अंमलबजावणी करण्यासाठी राज्यात सुरक्षा रक्षक मंडळे स्थापन करण्यात आली आहेत. सदरहू सुरक्षा रक्षक मंडळात सुरक्षा रक्षकांची नोंदणी मंडळाने योजना (सुधारणा) २०१२ प्रमाणे करणे अभिप्रेत आहे. सुरक्षा रक्षक नोंदणी प्रकियेबाबत अनेक संघटनांनी मा. मुंबई उच्च न्यायालयात रिट याचिका क्रमांक २९३९/२०१६ दाखल केली आहे. सुरक्षा रक्षकांच्या नोंदणीची प्रक्रिया कालबध्द पध्दतीने विहित नियमानुसार,पारदर्शकपणे व जलदरित्या व्हावी यास्तव संगणीकृत ऑनलाईन प्रक्रिया विकसीत करण्याचे निर्देश मा. उच्च न्यायालयाने दिनांक ८ फेब्रुवारी २०१७ रोजी दिले आहेत. त्या अनुषंगाने राज्यातील सर्व सुरक्षा रक्षक मंडळांत सुरक्षा रक्षकांची ऑनलाईन नोंदणी करण्यासाठी आज्ञावली विकसीत करुन ती त्वरीत अंमलात आणण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने आता खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

राज्यातील सर्व सुरक्षा रक्षक मंडळांनी मा. उच्च न्यायालयाच्या दिनांक ८ फेब्रुवारी २०१७ च्या आदेशातील निर्देशाप्रमाणे मंडळांत सुरक्षा रक्षकांची ऑनलाईन नोंदणी करणे अनिवार्य आहे.

१. या संदर्भातील आयुक्त, कामगार यांच्या दिनांक ४ मार्च, २०१७ व दिनांक ८ मार्च, २०१७ च्या प्रस्तावास शासन मान्यता देत आहे.

२. संगणक प्रणाली विकसीत करुन ती त्वरेने विहित मुदतीत दिनांक ३१ मार्च,२०१७ पर्यन्त कार्यान्वित होणे आवश्यक असल्याने कामगार आयुक्त कार्यालय या सर्व प्रक्रियेचे जबाबदारीने समन्वय करेल व यासाठी सेवा करार व कार्यादेशाचा मसुदा अंतिम करेल. संगणक आज्ञावली कार्यान्वित झाल्याचा पूर्तता अहवाल दिनांक २ एप्रिल, २०१७ रोजी शासनास सादर करेल.

३. मे. महाऑनलाईन या संस्थेकडून संगणक आज्ञावली विकसित करुन ती त्वरीत कार्यान्वित करण्यासाठी सर्व मंडळांनी उक्त संस्थेशी सेवा करार करुन अंतिम केलेल्या मसुद्यात कार्यादेश द्यावेत.

४. सर्व मंडळांनी नियमातील तरतुदीनुसार,तसेच आयुक्तांच्या सहमतीने त्यांनी संदर्भाधीन पत्रात प्रस्तावित केल्याप्रमाणे नोंदणी अर्जासाठी एकसमान शुल्क आकारावे.

५. मे. महाऑनलाईन या संस्थेला प्रती अर्ज रु.२०/- दर देण्यास मान्यता आहे.

६. महाऑनलाईन सर्व शुल्क ई-पेमेंट गेट वे द्वारा एकत्रित जमा करेल व स्वत:चे प्रती अर्ज शुल्क वजा करुन मंडळाचे शुल्क दर पंधरवडयात संबंधित मंडळाकडे जमा करेल. या कार्यवाहीचा जमा-लेख्याचा संगणकीकृत ताळमेळ महाऑनलाईन तसेच संबंधित मंडळामार्फत अद्ययावत ठेवला जाईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९८१ च्या कलम ८(४) अन्वये तसेच माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१७१५०८२२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3e1fb27510d815dfa2ea1884eedb57e92914ff13c7358c095d3c03f9593e23d5, cn=Varsha M Bharose
Date: 2017.03.14 17:16:32 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. मंत्री(कामगार) यांचे खाजगी सचिव,
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,
३. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई,
४. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
५. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
६. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई,
८. मा. मुंबई उच्च न्यायालयाचे प्रबंधक, मुंबई,
९. सह कामगार आयुक्त (माथाडी), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. सर्व अध्यक्ष/सचिव, सुरक्षा रक्षक मंडळ, बृहन्मुंबई व ठाणे, रायगड, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, धुळे,सांगली, अहमदनगर,अमरावती, चंद्रपूर, कोल्हापूर, रत्नागिरी व सोलापूर,
११. सर्व जिल्हा सरकारी कामगार अधिकारी,
१२. निवड नस्ती,कामगार-५, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.